खाजगी पडीक जमिनीवर रोजगार हमी योजनेशी
निगडीत वृक्ष लागवड व वैरण विकास योजना
रोहयो निधी मागणीच्या प्रस्तावासह सादर
करावयाच्या प्रमाणपत्राबाबत.

महाराष्ट्र शासन,
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२००८/प्र.क्र.५२/जल-१२
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक : १ जून, २००९

**संदर्भ** :- १. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. एसएलएफ-१८/०६/प्र.क्र.८२/जल-१२ दिनांक १३ जुलै, २००६.

२. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रएसएलएफ-२००८/प्र.क्र.५२/जल-१२ दिनांक ३ फेब्रुवारी, २००९.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय बांबू अभियानाअंतर्गत बांबू लागवडीकरीता प्राप्त अनुदानाच्या निधीची रोहयोशी निगडीत वृक्ष लागवड व वैरण विकास योजनेशी सांगड घालून अनुदान वितरीत करण्याबाबत संदर्भ क्र.२ मधील दि.३ फेब्रुवारी,२००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयास अनुसरुन खाजगी पडीक जमिनीवर रोहयोशी निगडीत वृक्ष लागवड व वैरण विकास योजनेअंतर्गत जिल्हाधिकारी यांचेकडे निधीची मागणी करण्यासाठी खालीलप्रमाणे पध्दत अनुसरण्यात यावी.

खाजगी पडीक जमिनीवर रोहयोशी निगडीत वृक्ष लागवड व वैरण विकास योजनेंतर्गत जिल्हाधिकाऱ्यांकडून रोहयो निधीची मागणी करताना राष्ट्रीय बांबू अभियानात प्राप्त अनुदानाची रक्कम वजा करुन मागणी करावी. **तसेच सदर निधी मागणीच्या प्रस्तावासोबत संबंधित उपसंचालक, सामाजिक वनीकरण यांनी खालील प्रमाणपत्र सादर करावे.**

**प्रमाणपत्र**

याद्वारे सन ------------ या वर्षासाठी खाजगी पडीक जमिनीवर रोहयोशी निगडीत वृक्ष लागवड व वैरण विकास योजनेंतर्गत अनुदानाची मागणी करण्यात येत असून याबाबत असे प्रमाणित करण्यात येते की, बांबू लागवडीकरिता लागू असलेल्या एकूण रु.------------------ अनुदानापैकी केंद्र शासनाकडून राष्ट्रीय बांबू अभियानाअंतर्गत प्राप्त झालेले रु.----------- इतके अनुदान वगळून उर्वरित रु.------------ इतक्या अनुदानाची मागणी करण्यात आलेली आहे.

उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, जिल्हा.........

......२/-

२. सदर शासन शुध्दीपत्रक रोहयो विभागाच्या क्र.रोहयो-२००९/प्र.क्र.११९/रोहयो-५, दि.६/५/२००९ नुसार दिलेल्या मान्यतेप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.२००९०६०११४३८०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( श्या. र. चौरे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव/मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव/मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई,
अप्पर मुख्य सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते/सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महालेखापाल महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग (रोहयो-५), मंत्रालय, मुंबई,
सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव (जलसंधारण विभाग), मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, जल-१२.